**आदिवासी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण**

महाराष्ट्र शासन
शासन निर्णय क्रमांक औप्रसं १२०४/प्र.क्र २३/का.१२
आदिवासी विकास विभाग
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२
दिनांक : २३ ऑगस्ट, २००४

**प्रस्तावना :** सामाजिक विकास क्षेत्रात समाजातील वंचित व दुर्बल घटकांना सामाजिक न्याय देण्याच्या संदर्भात प्रोजेक्ट युनाईटचे सादरीकरण करण्याच्या प्रस्तावाला मंत्रिमंडळाने दिनांक २८.१.२००४ रोजी मान्यता दिलेली आहे. राज्यामध्ये एकूण ३४७ औद्योगिक प्रशिक्षण संस्था असून त्यामधील प्रवेश क्षमता ६३,९१६ अशी आहे. त्यापैकी आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गत ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्था कार्यरत असून तेथे आदिवासी विद्यार्थ्यांकरिता एकूण १०१५१ जागा राखीव आहेत. या प्रस्तावात व्यवसाय शिक्षणाशी संबंधित आदिवासी उपयोजना क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील आदिवासींच्या रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण करण्याच्या बाब समाविष्ट आहे. बिकट आर्थिक परिस्थितीमुळे बहुतांश आदिवासी एस.एस.सी पर्यंतचे शिक्षण पूर्ण करु शकत नाहीत त्यामुळे त्यांना मोलमजुरी करुन उदरनिर्वाह करणे भाग पडते. या भागामध्ये व्यवसाय शिक्षण प्रशिक्षणाच्या सुविधा व संधी कमी प्रमाणात आहेत. तसेच वसतीगृहाची सोय नसल्यामुळे आदिवासी विद्यार्थी आपले गांव सोडून इतर ठिकाणी व्यवसाय प्रशिक्षण घेण्यांस उत्सुक नसतात. परिणामी ते व्यवसाय प्रशिक्षणापासून वंचित राहतात. औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील विविध व्यवसायांमध्ये दिले जाणारे प्रशिक्षण कौशल्याभिमुख असते हे प्रशिक्षण पूर्ण केल्यानंतर उमेदवारांची रोजगार स्वयंरोजगार क्षमता वाढून ते स्वावलंबी जीवन जगू शकतात. त्यामुळे राज्यामध्ये आदिवासींसाठी रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरणाचा कार्यक्रम राबवून त्या अंतर्गत आदिवासी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये नविन व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करणे, कमी मागणीचे व्यवसाय अभ्यासक्रम बंद करुन त्याजागी जादा मागणीचे व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करणे, आदिवासी आश्रमशाळांचे रुपांतर व्यवसायिक शिक्षण आश्रमशाळांमध्ये करणे, औद्योगिक प्रशिक्षण संस्थांच्या नजीकच्या परिसरातील आश्रमशाळेमधील आदिवासी विद्यार्थ्यांसाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये ८ वी ते १० वी स्तरावर पूर्वव्यवसायिक शिक्षण सुरु करणे तसेच १० वी नंतर या विद्यार्थ्यांसाठी व्यवसाय प्रशिक्षणाच्या संधी निर्माण करणे, औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील वसतीगृहात राहणा-या व वसतीगृहाबाहेर राहणा-या आदिवासी उमेदवारांना निर्वाह भत्ता देणे, आदिवासी औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये वसतीगृहाची सोय करणे, आदिवासी विद्यार्थ्यांसाठी पुस्तकपेढी विकसित करणे, व्यवसाय प्रशिक्षणाद्वारे आदिवासी महिलांचे सक्षमीकरण करणे, आदिवासी शिकाऊ उमेदवारांना निर्वाहभत्ता देणे, बेरोजगार आदिवासी उमेदवारांसाठी मागेल त्याला व्यवसाय प्रशिक्षण योजना राबविणे अशा विविध योजना सुरु करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार या

बाबींतर्गत राबवावयाच्या योजनाबाबतचा कृती आराखडा तयार करुन तो मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आलेला होता.

**शासन निर्णय :-** प्रस्तावनेत नमूद केल्यानुसार मंत्रिमंडळाने उपरोक्त कृती आराखड्यास दिनांक १८.८.२००४ रोजी मान्यता दिली असून त्याप्रमाणे आदिवासी उपयोजना क्षेत्रातील एकूण ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील रोजगाराभिमुख व्यवसाय शिक्षणाचे सार्वत्रिकरण करण्याच्या संदर्भात सदर कृती आराखडयाच्या योजनेची अंमलबजावणी सन २००४-०५ ते २००६-०७ या ३ वर्षामध्ये टप्प्याटप्प्याने पुढील परिच्छेदात नमूद केलेल्या कार्यपध्दतीनुसार राबविण्यास शासन मान्यता देत आहे.

(१) **योजनेची व्याप्ती** :-

समाजातील अतिदुर्बल व वंचित आदिवासी विद्यार्थ्यांना रोजगार व स्वयंरोजगाराभिमुख करण्यासाठी व तो रोजगारासाठी पात्र होण्याकरिता विद्यमान औद्योगिक प्रशिक्षणामध्ये आवश्यक त्या सुधारणा करुन व्यवसाय शिक्षणाचे बळकटीकरण करणे व त्याचे सार्वत्रिकरण करण्यासाठी एकूण १२ योजना कृती आराखड्यामध्ये अंतर्भुत करण्यात आलेल्या आहेत. सदर कृती आराखडयाकरिता एकूण रु.६५१५.०० लाख एवढया निधीची आवश्यकता असून हा कार्यक्रम वर नमूद केल्याप्रमाणे सन २००४-०५ पासून ३ वर्षाच्या कालावधीत टप्प्याटप्प्याने राबवावयाचा आहे.

(२) **कृती आराखडयात समाविष्ट असलेल्या योजना** :-

सदर कृती आराखडयात खालील योजनांचा समावेश करण्यात आलेला आहे :-

| अ.क्र. | योजना |
|---|---|
| १ | आदिवासी उपयोजनेखाली एकूण ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये यंत्र सामुग्रीची त्रुटी दूर करणे. |
| २ | शासकीय आदिवासी आश्रमशाळांचे रुपांतर निवासी व्यवसाय प्रशिक्षण आश्रमशाळेमध्ये करणे. |
| ३ | औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील वसतिगृहात राहणाऱ्या आणि वसतिगृहाबाहेर राहणाऱ्या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांना निर्वाह भता देणे. |
| ४ | औद्योगिक प्रशिक्षण सुरु असलेल्या ठिकाणी किंवा जवळपासच्या अंतरावर सुरु असलेल्या आश्रमशाळांतील आदिवासी उमेदवारांकरिता ८ वी ते १० वी स्तरावर पुर्वव्यावसायिक शिक्षण सुरु करणे. तसचे १० वी नंतर औद्योगिक प्रशिक्षण संस्थेला व्यवसाय प्रशिक्षणाच्या संधी निर्माण करणे. |
| ५ | आदिवासी क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये नविन व्यवसाय/ अधिकच्या व्यवसाय तुकडया सुरु करुन अनुसूचित जमातीच्या उमेदवारांकरिता व्यवसाय प्रशिक्षणाच्या संधी वाढविणे. |
| ६ | आदिवासी क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील कमी मागणीचे व्यवसाय(ट्रेडस्) बंद करुन त्या ठिकाणी जादा मागणीचे व्यवसाय प्रशिक्षण सुरु करणे. |
| ७ | आदिवासी उपयोजनेखाली सुरु करण्यात आलेल्या शासकीय आद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये वसतिगृहांची सोय करणे. |
| ८ | आदिवासी उपयोजनेखाली सुरु करण्यात आलेल्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील वसतिगृहांचे बांधकाम करणे. |
| ९ | औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये आदिवासी विद्यार्थ्यांसाठी पुस्तकपेढी विकसित करणे. |
| १० | शिकाऊ उमेदवारी योजनेंतर्गत दुर्गम भागातील आदिवासी शिकाऊ उमेदवारांना निर्वाह भत्ता देणे. |
| ११ | व्यवसाय प्रशिक्षणाद्वारे आदिवासी महिलांचे सक्षमीकरण करणे. |
| १२ | अनुसूचित जमातीच्या उमेदवारांसाठी मागेल त्याला व्यवसाय प्रशिक्षण योजना लागू करणे. |

(३) **योजनांच्या अंमलबजावणीची कार्यपध्दती** :-

(एक) **आदिवासी उपयोजनेखाली एकूण ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये यंत्र सामुग्रीची त्रुटी दूर करणे :-**

आदिवासी उपयोजनेखालील एकूण ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील प्रशिक्षणाचा दर्जा सतत उच्च स्तरावर राहण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण केंद्रात आवश्यक असलेली अद्ययावत यंत्रसामुग्री उपलब्ध करुन द्यावी लागते. तसचे अभ्यासक्रमाच्या पाठयक्रमामध्ये विहीत केलेली सर्व हत्यारे, यंत्रसामुग्री यांचा संपूर्ण संच खरेदी करुन तसेच सततच्या वापरामुळे अथवा काही कालावधीनंतर निरुपयोगी ठरणारी हत्यारे निर्लेखित करुन त्या जागी नविन हत्यारे अथवा यंत्रसामुग्री खरेदी करुन औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील यंत्रसामुग्रीची त्रुटी टप्प्याटप्प्याने भरुन काढण्यात यावी. हा कार्यक्रम ३ वर्षात खालीलप्रमाणे राबवावयाचा असून त्याकरिता एकूण रु.८४२.२७ लाख एवढा व्यय वेळोवेळी उपलब्ध करुन देण्यात येईल :-

| **अ.क्र.** | **वर्ष** | **तरतूद (रु.लाखात)** |
|---|---|---|
| १ | २००४-०५ | २५.२७ |
| २ | २००५-०६ | ४०९.०० |
| ३ | २००६-०७ | ४०८.०० |
| | **एकूण** | **८४२.२७** |

ही योजना वरीलप्रमाणे राबविण्यासाठी ३ वर्षाचा कालबध्द कार्यक्रम उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अधिनस्त असलेल्या संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी तयार करावा. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी आवश्यक असलेली यंत्रसामुग्री व हत्यारांची खरेदी केंद्र शासनाने व्यवसाय अभ्यासक्रमाप्रमाणे प्रमाणित केलेल्या यादीनुसार व शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार करावी. यंत्रसामुग्रीची त्रुटी भरुन काढावयाच्या एकूण ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांची यादी **परिशिष्ट-१** मध्ये देण्यात आलेली आहे. औद्योगिक प्रशिक्षण संस्थानिहाय यंत्रसामुग्रीची त्रुटींचा तपशील संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी निश्चित करावा.

(दोन) **शासकीय आदिवासी आश्रमशाळांचे रुपांतर निवासी व्यवसाय प्रशिक्षण आश्रमशाळेमध्ये करणे :-**

आदिवासी विकास विभागामार्फत शासकीय आश्रमशाळा चालविल्या जातात. या आश्रमशाळा आदिवासी अतिदुर्गम व डोंगराळ भागात आहेत. या शाळेत शिकणाऱ्या आदिवासी विद्यार्थ्यांमध्ये व्यवसाय शिक्षणाची आवड निर्माण करणे व त्यांना पुढे रोजगारक्षम बनविणे यासाठी इ. ८ वी ते इ. १० वीच्या स्तरावर पूर्व व्यावसायिक शिक्षणाची सोय करणे तसेच इ. १० वी नंतर

औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये व्यवसाय प्रशिक्षण देवून त्यांना स्वयंपूर्ण व स्वावलंबी करणे यासाठी राज्यातील एकूण **२८** शासकीय आदिवासी पोस्ट बेसिक आश्रमशाळांमध्यें औद्योगिक प्रशिक्षण संस्था सुरु करुन व्यवसाय अभ्यासक्रमाचे प्रशिक्षण सुरु करावे व औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील पायाभूत सोयीसुविधांचा वापर करुन इ. ८ वी ते १० वी स्तरावर पूर्व व्यावसायिक शिक्षण सुरु करण्यात यावे. या २८ पोस्ट बेसिक आश्रमशाळांमध्ये शासकीय तांत्रिक माध्यमिक शाळा केंद्र सुरु करुन **सन २००४-०५** मध्ये १० आश्रमशाळा, **२००५-०६** मध्ये १० आश्रमशाळा व **२००६-०७** मध्ये ८ आश्रमशाळांचे व्यवसाय प्रशिक्षण आश्रमशाळांमध्ये रुपांतर करण्यात यावे. या आश्रमशाळांची वर्षनिहाय यादी **परिशिष्ट-२** मध्ये देण्यात येत आहे. या आश्रमशाळांमध्ये उपलब्ध असलेल्या जमिनीपैकी सुमारे २००० चौ.फुट क्षेत्रफळाच्या जागेवर कार्यशाळेचे बांधकाम करुन तेथे औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमार्फत उत्पादनाभिमुख प्रशिक्षण योजनेंतर्गत प्रशिक्षण देण्यात यावे. या योजनेचे संनियंत्रण आदिवासी विकास विभागाच्या क्षेत्रीय यंत्रणेकडे सोपविण्यात येत असून उपरोक्त २८ शासकीय पोस्ट बेसिक आश्रमशाळेमध्ये **परिशिष्ट २(१)** व **परिशिष्ट-३** मधील व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करुन दरवर्षी७२०० आदिवासी विद्यार्थ्यांना शिकवण्याबाबतचा कालबध्द कार्यक्रम संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी तयार करावा व त्यास आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची मान्यता घ्यावी. ही योजना आदिवासी विकास विभागाने संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचेमार्फत राबवावी. या योजनेकरिता एकूण रु.८३०.४० लाख निधीची आवश्यकता असून आदिवासी उपयोजनेंतर्गत संदर्भीय जिल्हयाच्या जिल्हा नियोजन मंडळाला देण्यात यावयाच्या नियतव्ययामधून तरतूद उपलब्ध करुन दिली जाईल. जादा नियतव्ययाची आवश्यकता भासल्यास, अन्य स्त्रोतांमधून पूरेशी तरतूद उपलब्ध करुन दिली जाईल. या योजनेखाली उपलब्ध करुन द्यावयाचा निधी आयुक्त, आदिवासी विकास यांनी संचालक, प्रशिक्षण यांनी ठरवून दिलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थेकडे वर्ग करुन त्या संस्थेच्या स्वीय प्रपंची लेख्यामध्ये जमा करुन खर्च करण्यात यावा. कार्यशाळेच्या बांधकामाचे नकाशे संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने आयुक्त, आदिवासी विकास यांच्या अनुमतीने मंजूर करावेत. तसेच या कामाचे अंदाजपत्रक व तांत्रिक मंजूरी इ.ची प्रक्रिया संचालक(प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांनी सक्षम प्राधिकाऱ्यांमार्फत पूर्ण करावी. या योजनेकरिता प्रत्येक व्यवसाय प्रशिक्षण शाळेसाठी ८ या प्रमाणे एकूण २२४ पदे निर्माण करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. ही पदे कंत्राटी पध्दतीने ठराविक एकत्रित मासिक वेतनावर भरण्यात यावीत. पद भरतीची प्रक्रिया संचालनालय स्तरावर निवड समिती गठित करुन त्यामार्फत करावी. निर्माण करावयाची पदे व सुरु करावयाचे अभ्यासक्रम याचा तपशील **परिशिष्ट-३** मध्ये देण्यात आला आहे. व्यवसायिक शिक्षण आश्रमशाळांमध्ये लोकसेवा केंद्रदेखील स्थापन करण्यात यावी. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधून उत्तीर्ण प्रशिक्षणार्थ्यांना लोकसेवा केंद्राचे सभासद करुन घेण्यात यावे. औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील साधनसामुग्रीचा वापर सदर विद्यार्थी लोकसेवा केंद्रांतर्गत मिळालेली कामे करण्यासाठी व स्वयंरोजगारासाठी करु शकतील. या योजनेची

अंमलबजावणी करण्यासाठी चालू वर्ष सन २००४-०५ करिता कार्यशाळा बांधकाम व यंत्रसामुग्री खरेदी यासाठी रु.२५६.५० लाख, सन २००५-०६ साठी अनावर्ती खर्च, वेतन, कच्चा माल, कार्यालयीन खर्च इ. आवर्ती खर्चासाठी रु.२७६.८० लाख व सन २००६-०७ साठी रु.२९७.१० लाख एवढा निधी असा एकूण रु. ८३०.४० लाख एवढा निधी आयुक्त, आदिवासी विकास यांचे अधिनस्त ठेवण्यात येईल. आयुक्त, आ.वि.यांनी या कामाचे सुव्यवस्थित नियोजन करुन ही योजना राबवावी. याबाबतची संपूर्ण जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास यांचेवर सोपविण्यात येत आहे.

(तीन) **औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील वसतिगृहात राहणाऱ्या आणि वसतिगृहाबाहेर राहणाऱ्या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांना निर्वाह भता देणे :-**

आदिवासी उमेदवार हे आदिवासी क्षेत्रातील दुर्गम व डोंगराळ भागात राहतात. त्यांची आर्थिक स्थिती हलाखीची असते. त्यामुळे त्यांना तालुक्याच्या ठिकाणी येवून राहण्याची व जेवणाची सोय नसल्यामुळे ते औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये प्रवेश घेऊ इच्छित नसतात. तसेच जे उमेदवार प्रवेश घेतात ते वरील कारणास्तव अर्धवट प्रशिक्षण सोडून देतात. परिणामी, राज्यातील आदिवासी उपयोजनेंतर्गत असलेल्या ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्था व इतर औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये अनुसूचित जमातीच्या उमेदवारांसाठी राखीव असलेल्या जागा पूर्णपणे भरल्या जात नाहीत. सरासरी किमान ३०% जागा रिक्त राहतात. त्यामुळे अनुसूचित जमातीच्या उमेदवारांना पाठयक्रम पुस्तके, निवासव्यवस्था, भोजन व्यवस्था, प्रशिक्षण स्टेशनरी इत्यादी खर्च भागविण्यांसाठी ज्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये वसतिगृहाची सोय आहे तेथे राहणाऱ्या आणि वसतिगृहाबाहेर राहणाऱ्या अनुसूचित जमातीच्या उमेदवारांना सुधारित दराने निर्वाह भत्ता देण्याचे ठरविण्यात आले आहे. व्यावसायिक अभ्यासक्रमासाठी प्रवेश घेतलेल्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना इतर अभ्यासक्रमाच्या तुलनेत मिळणाऱ्या निर्वाह भत्त्याची रक्कम फारच अल्प (रु.६०/-) इतकी आहे. या विद्यावेतनातून पाठयक्रम पुस्तके, निवास व्यवस्था, भोजन व्यवस्था, स्टेशनरी इ.खर्च ते भागवू शकत नाहीत. आयटीआयमधील विद्यार्थ्यांना भारत सरकार शिष्यवृत्तीदेखील अनुज्ञेय नाही. या सर्व बाबी विचारात घेऊन औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील वसतिगृहात राहणाऱ्या अनुसूचित जमातीच्या विद्यार्थ्यांना रु.६००/- व वसतिगृहाबाहेर राहणाऱ्या विद्यार्थ्यांना रु.५००/- इतका सुधारित निर्वाह भत्ता मंजूर करण्यात येत आहे. हा निर्वाह भत्ता मंजूर करण्यापूर्वी संबंधित संस्थेच्या प्राचार्यांनी अनुसूचित जमातीच्या उमेदवारांची यादी संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प यांचेकडून मंजूर करुन घेणे आवश्यक आहे. या योजनेचा लाभ एकूण ११००० इतक्या आदिवासी विद्यार्थ्यांना होणार असून त्याकरिता रु.६२०.०० लाख इतकी तरतूद अपेक्षित आहे. त्यापैकी सन २००४-०५ करिता रु.२०६.०० लाख ही तरतूद आदिवासी उपयोजनेतील राज्यस्तरीय नियतव्ययातून उपलब्ध करुन दिली जाईल.

औद्योगिक प्रशिक्षण संस्थेच्या वसतिगृहामध्ये भोजनाची सोय नसल्यामुळे विद्यार्थ्यांकरिता को-ऑपरेटिव्ह मेसिंग किंवा कंत्राटदार नेमून भोजनाची व्यवस्था व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने करावी. जेणेकरुन, विद्यार्थ्यांना मिळणारा निर्वाह भत्ता अनावश्यक गोष्टीकरिता होणार नाही. या भोजन व्यवस्थेचा लाभ विद्यार्थ्यांना सक्तीने करण्यात यावा. सदर योजना पूर्णतः व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी राबवावी.

(चार) **औद्योगिक प्रशिक्षण सुरु असलेल्या ठिकाणी किंवा जवळपासच्या अंतरावर सुरु असलेल्या आश्रमशाळांतील आदिवासी उमेदवारांकरिता ८ वी ते १० वी स्तरावर पुर्वव्यावसायिक शिक्षण सुरु करणे. तसेच १० वी नंतर औद्योगिक प्रशिक्षण संस्थेला व्यवसाय प्रशिक्षणाच्या संधी निर्माण करणे :-**

शासकीय आदिवासी आश्रमशाळेतील सर्वसाधारण चाकोरीबध्द शिक्षणाला व्यवसाय शिक्षणाची जोड देऊन विद्यार्थ्यांना रोजगार व स्वयंरोजगारासाठी सक्षम करण्याच्या उद्देशाने औद्योगिक प्रशिक्षण सुरु असलेल्या ठिकाणी किंवा जवळ-पासच्या अंतरावर सुरु असलेल्या आश्रमशाळांतील आदिवासी विद्यार्थ्यांकरिता इ. ८ वी ते १० वी स्तरावर पुर्वव्यावसायिक शिक्षण देण्यासाठी तसेच १० वी नंतर औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये व्यवसाय प्रशिक्षण देणे व त्याद्वारे व्यवसाय शिक्षणाच्या संधी निर्माण करुन देणे आवश्यक आहे. या अभ्यासक्रमांतर्गत इलिमेंटस् ऑफ मेकॅनिकल इंजिनियरिंग, इलिमेंटस् ऑफ इलेक्ट्रीकल ॲण्ड इलेक्ट्रॉनिक्स टेक्नॉलॉजि हे अभ्यासक्रम तसेच इ.१० वी नंतर इलेक्ट्रीशियन, फॅशन टेक्नॉलॉजि, ड्रायव्हर कम मेकॅनिक, वायरमन इ. व्यवसाय प्रशिक्षण देऊन आदिवासी विद्यार्थ्यांना स्वावलंबी करण्याचा उद्देश आहे. या योजनेंतर्गत आश्रमशाळेपासून औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये ये-जा करण्यासाठी उमेदवारांना सायकली पुरविण्यात याव्यात. प्रथम टप्प्यात ही योजना एकूण ११ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये राबविण्यात यावी. या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शासकीय तंत्र माध्यमिक शाळा केंद्र सुरु करण्यास मान्यता देण्यात येत आहे. वित्तीय वर्ष २००४-०५ पासून सदर योजना राबवावयाच्या ११ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांची यादी **परिशिष्ट-४** मध्ये सोबत जोडण्यात आली आहे.

आश्रमशाळांतील जे विद्यार्थी एस.एस.सी.उत्तीर्ण झाल्यानंतर जवळच्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये अनुसूचित जमातीच्या राखीव जागांवर गुणवत्तेनुसार प्रवेश घेतील, त्यांची त्या आश्रमशाळांमध्येच राहण्याची व भोजनाची व्यवस्था करण्यात यावी.

या योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रत्येक औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये सहाय्यक अधिव्याख्याता या संवर्गातील १ पद याप्रमाणे ११ पदे निर्माण करण्यास मंजूरी देण्यात येत असून सदर पदे कंत्राटी पध्दतीने रु.४०००/- एकत्रित मासिक वेतनावर भरण्यात यावीत. तसेच सदर पदे व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय स्तरावर निवड समिती गठित करुन विहित पध्दतीने भरण्यात

यावीत. या योजनेसाठी निदेशक पदाचे काम औद्योगिक प्रशिक्षण संस्थेत कार्यरत असलेल्या निदेशकाकडून करुन घेण्यात यावे व त्यांना या अतिरिक्त कामासाठी रु.४००/- प्रतिमाह मानधन देण्यात यावे. योजनेच्या अंमलबजावणीसाठी वित्तीय वर्ष २००४-०५ साठी यंत्रसामुग्री व टुल किटस् खरेदीकरिता अनावर्ती खर्च म्हणून रु. ४४.०० लाख, सन २००५-०६ साठी सायकल पुरविणे, वेतन, कच्चा माल, कार्यालयीन व इतर आवर्ती खर्चासाठी रु.३१.०० लाख आणि सन २००६-०७ या वर्षासाठी रु. ३१.०० लाख अशा प्रकारे ३ वर्षासाठी एकूण रु.१०६.०० लाख इतका निधी उपलब्ध करण्यात येईल. ही योजना संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचेकडून राबविली जाईल. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी आवश्यक असलेली यंत्रसामुग्री व हत्यारांची खरेदी केंद्र शासनाने व्यवसाय अभ्यासक्रमाप्रमाणे प्रमाणित केलेल्या यादीनुसार व शासनाने विहित केलेल्या पध्दतीनुसार करावी.

(पाच) **आदिवासी क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये नविन व्यवसाय/ अधिकच्या व्यवसाय तुकडया सुरु करुन अनुसूचित जमातीच्या उमेदवारांकरिता व्यवसाय प्रशिक्षणाच्या संधी वाढविणे :-**

आदिवासी उपयोजनेंतर्गत असलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये सध्या देण्यात येत असलेल्या व्यवसाय अभ्यासक्रम प्रशिक्षणामध्ये कालानुरुप तंत्रज्ञानामध्ये अमुलाग्र झालेला बदल विचारात घेऊन तसेच उत्पादन क्षेत्रामध्ये मनुष्यबळाची गरज कमी होत असली तरी सेवाक्षेत्रामध्ये कारागिरांची मागणी अधिक आहे. त्यामुळे आदिवासी उपयोजनांतर्गत असलेल्या ३५ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये आधुनिक तंत्रज्ञानावर आधारित व स्थानिक गरजांनुसार मागणी असलेले ४६ नविन व्यवसाय अभ्यासक्रम/ अधिकच्या तुकडया सुरु करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. सन २००४-०५ या वर्षामध्ये १८ नविन व्यवसाय अभ्यासक्रम / अधिकच्या तुकडया, सन २००५-०६ मध्ये १४ नविन व्यवसाय तुकडया सन २००६-०७ या वर्षी १४ नविन व्यवसाय तुकडया सुरु करण्यात याव्यात. औद्योगिक प्रशिक्षण संस्था व सुरु करावयाचे व्यवसाय अभ्यासक्रम यांची वर्षनिहाय यादी **परिशिष्ट-५** मध्ये दर्शविण्यात आलेली आहे.

नविन प्रस्तावित अभ्यासक्रमामध्ये प्रामुख्याने मुलींकरिता ड्रेसमेकिंग, डेटा एंट्री ऑपरेटर व मुलांकरिता ड्रायव्हर कम मेकॅनिक इ. अभ्यासक्रमांचा समावेश करण्यात यावा. नविन अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी ३५ संस्थांमध्ये शिल्पनिदेशक या संवर्गातील एकूण ४६ पदे निर्माण करण्यास मंजूरी देण्यात येत असून ही पदे कंत्राटी पध्दतीने रु.५५००/- एकत्रित मासिक वेतनावर भरण्यात यावीत. तसेच पद भरण्याची प्रक्रिया संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांच्या स्तरावर समिती गठित करुन त्यांच्यामार्फत विहित पध्दतीने करण्यात यावी.

सन २००४-०५ यावर्षी सुरु करावयाच्या १८ नविन व्यवसाय अभ्यासक्रम/ अधिकच्या तुकडयापैकी १४ तुकडयांसाठी लागणारी यंत्रसामुग्री व हत्यारे सध्या उपलब्ध आहेत. त्यामुळे फक्त पदांची भरती करुन या व्यवसायांचे प्रशिक्षण तातडीने सुरु करण्यात यावे. उर्वरित ४ नविन व्यवसाय अभ्यासक्रमासाठी यंत्रसामुग्री व टुल किटस्च्या खर्चासाठी रु. ४२.०० लाख तसेच सन २००५-०६ साठी यंत्रसामुग्री व टुल किटस् खरेदीकरिता रु.१४६.०० लाख आणि वेतन, कच्चा माल इ. साठी रु.२०.५० लाख अशाप्रकारे एकूण रु. १६६.५० लाख व सन २००६-०७ करिता यंत्रसामुग्री, टुल किटस् खरेदी आणि वेतन, कच्चा माल इ.साठी एकूण रु.१८७.०० लाख इतकी तरतूद उपलब्ध करुन देण्यात येईल. अशा रितीने या योजनेकरिता रु.३९६.०० लाख निधी देण्यात यावा. सदर योजनेमुळे दरवर्षी अनुसूचित जमातीतील उमेदवारांची औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील प्रवेश क्षमता १०८० ने वाढणार आहे. सदर योजना जिल्हास्तरीय योजना म्हणून राबविली जाईल. त्याकरिता लागणारा निधी जिल्हा नियोजन मंडळाकडून उपलब्ध करण्यात येईल. आवश्यकतेनुसार आदिवासी उपयोजनेच्या राज्यस्तरीय तरतूदीमधून निधी उपलब्ध करुन दिला जाईल. सदर योजना व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत राबविली जाईल. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी आवश्यक असलेली यंत्रसामुग्री व हत्याराची खरेदी केंद्र शासनाने व्यवसाय अभ्यासक्रमाप्रमाणे प्रमाणित केलेल्या यादीनुसार व शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार करावी.

(सहा) **आदिवासी क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील कमी मागणीचे व्यवसाय(ट्रेडस्) बंद करुन त्या ठिकाणी जादा मागणीचे व्यवसाय प्रशिक्षण सुरु करणे :-**

आदिवासी क्षेत्रातील विद्यमान औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील जुन्या तंत्रज्ञानावर आधारित असलेल्या व्यवसायांना रोजगार क्षेत्रात कमी मागणी आहे. त्यामुळे कमी मागणीचे हे व्यवसाय (ट्रेडस्) बंद करुन त्याऐवजी रोजगार व स्वयंरोजगाराभिमूख सेवाक्षेत्रात/स्थानिक गरजांनुसार जास्त मागणी असलेले व्यवसाय सुरु करणे आवश्यक झाल्याने ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांपैकी ३६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमधील ५३ व्यवसाय तुकडया बंद करुन त्याऐवजी जादा मागणीचे नविन व्यवसाय सुरु करण्यास मंजूर देण्यात येत आहे. या कार्यक्रमांतर्गत सन २००४-०५ या वर्षी १७ नविन व्यवसाय अभ्यासक्रम, सन २००५-०६ या वर्षी १८ नविन व्यवसाय अभ्यासक्रम व सन २००६-०७ या वर्षी १८ नविन व्यवसाय अभ्यासक्रम तुकडया सुरु करण्यात याव्यात. औद्योगिक प्रशिक्षण संस्था व व्यवसाय अभ्यासक्रम यांची वर्षनिहाय यादी सोबत **परिशिष्ट-६** मध्ये देण्यात आलेली आहे.

नविन अभ्यासक्रमासाठी ३६ संस्थांमध्ये शिल्पनिदेशक या संवर्गातील ५३ पदे निर्माण करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. त्यापैकी १७ पदे औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील निदेशकांना प्रशिक्षण देऊन समायोजित करण्यात यावीत. ३६ नविन पदे कंत्राटी पध्दतीने रु.५५००/- एकत्रित मासिक वेतनावर संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांच्या स्तरावर निवड समिती गठित करुन विहित पध्दतीने भरण्यात यावीत. नविन

व्यवसाय अभ्यासक्रमासाठी लागणारी यंत्रसामुग्री व टुल किटस् यांची खरेदी करण्याकरिता सन २००४-०५ या वर्षी रु. १४४.५० लाख, सन २००५-०६ या वर्षी रु. १५३.०० लाख व सन २००६-०७ या वर्षासाठी रु.१५३.०० लाख याप्रमाणे आवर्ती व अनावर्ती खर्च मिळून रु.४५०.५० लाख इतकी तरतूद अपेक्षित आहे. ही तरतूद जिल्हा नियोजन मंडळ व आदिवासी उपयोजनेतील राज्यस्तरीय नियतव्ययातून भागविला जाईल. योजनेच्या परिणामी, औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये एकूण ४४८ ने प्रवेश क्षमता वाढणार आहे. ही योजना संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचेमार्फत राबविली जाईल. याबाबतचा कालबध्द कार्यक्रम संचालन, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी तयार करुन टप्प्याटप्प्याने राबवावा.

(सात) **आदिवासी उपयोजनेखाली सुरु करण्यात आलेल्या शासकीय आद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये वसतिगृहांची सोय करणे :-**

आदिवासी उपयोजना क्षेत्रातील ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांपैकी केवळ ६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये वसतिगृहाचे बांधकाम पूर्ण झालेले आहे. उर्वरित ४७ संस्थांना वसतिगृहाची सोय करावयाची आहे. यासाठी बराच कालावधी लागणार आहे. त्यामुळे आदिवासी विद्यार्थ्यांच्या राहण्याच्या सोईची तातडीची निकड विचारात घेऊन ४७ संस्थांसाठी तात्पुरत्या स्वरुपात भाडयाच्या इमारतीत वसतिगृहाची सोय करुन तेथे विद्यार्थ्यांना राहण्यासाठी पलंग, गादी इ.सोईसुविधा उपलब्ध करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. या ४७ संस्थांपैकी ३७ संस्थांमध्ये २ व्यवसाय मुलींसाठी राखीव आहेत. त्यामुळे ३७ संस्थांच्या वसतिगृहामध्ये मुलींसाठी स्वतंत्र निवास व्यवस्था तयार करण्यात यावी. वसतिगृह सुविधा निर्माण करावयाच्या ४७ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांची यादी यासोबतच्या **परिशिष्ट-७** मध्ये देण्यात आलेली आहे.

वसतिगृहाची देखभाल व देखरेख करण्यासाठी औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील गटनिदेशक/वरिष्ठ निदेशक यांना वसतिगृह अधिक्षक म्हणून अतिरिक्त जबाबदारी देण्यात यावी व त्यांना या कामाचे मानधन म्हणून दरमहा रु. १०००/- अदा करण्यात यावे. तसेच ३७ संस्थांमधील मुलींच्या वसतिगृहाची देखभाल व देखरेख ठेवण्यासाठी संस्थेतील महिला निदेशकास केअरटेकर म्हणून अतिरिक्त जबाबदारी देऊन त्यांना या कामासाठी दरमहा रु.५००/- इतके मानधन देण्यात यावे. तथापि, औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये महिला कर्मचारी आवश्यक उपाययोजना करुन उपलब्ध न झाल्यास दरमहा रु.१०००/- मासिक एकत्रित मानधनावर महिला केअर टेकर म्हणून नेमणूक करण्यास संस्थेच्या प्राचार्यांना मुभा राहील.

या योजनेंतर्गत वसतिगृह सुविधेचा लाभ अंदाजे ३००० मुले/मुलींना होणार असून सन २००४-०५ या वर्षी वसतिगृहात पलंग व गादी यांचा पुरवठा करण्याकरिता रु. ५५.७७ लाख, तसेच वसतिगृहाचे भाडे व मानधन या आवर्ती खर्चासाठी रु.४२.२३ लाख याप्रमाणे एकूण रु. ९८.०० लाख

तसेच सन २००५-०६ व सन २००६-०७ या वर्षी आवर्ती खर्चासाठी रु. १२६.८० लाख इतकी तरतूद उपलब्ध करुन देण्यात येईल. ह्या खर्च आदिवासी उपयोजनेतील राज्यस्तरीय नियतव्ययातून तसेच आवर्ती खर्च उच्च व तंत्र शिक्षण विभागातर्फे योजनेतर तरतूदीतून करण्यात येईल. ही योजना संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत राबविली जाईल. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी आवश्यक असलेले साहित्य यांची खरेदी शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार करावी.

(आठ) **<u>आदिवासी उपयोजनेखाली सुरु करण्यात आलेल्या शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमधील वसतिगृहांचे बांधकाम करणे :-</u>**

आदिवासी उपयोजना क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये वसतिगृहाची सोय करण्यासाठी वसतिगृहाचे बांधकाम करण्याचे प्रस्तावित करण्यात आलेले आहे. ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांपैकी फक्त ६ संस्थांच्या वसतिगृहांची बांधकामे पूर्ण झाली असून ३ औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील वसतिगृह बांधकाम चालू आहे. उर्वरित ४७ संस्थांच्या वसतिगृहाचे बांधकाम करणे आवश्यक आहे. परंतु यापैकी ३९ संस्थांच्या वसतिगृहासाठी बांधकामाकरिता जागा उपलब्ध आहे. म्हणून या वसतिगृहाच्या बांधकामाचे काम टप्प्याटप्प्याने करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. पहिल्या टप्प्यात २५ ठिकाणी वसतिगृह बांधकाम करण्याचे प्रस्तावित असून त्यासाठी रु.११५०.०० लाख तर दूसऱ्या टप्प्यात १४ वसतिगृहांचे बांधकाम करण्याचे प्रस्तावित असून त्यासाठी रु.४२०.०० लाख याप्रमाणे रु.१६७६.०० लाख इतक्या निधीची आवश्यकता आहे. या योजनेच्या अंमलबजावणीसाठी लागणारा निधी केंद्र शासनाकडून विशेष केंद्रीय सहाय्यांतर्गत शिक्षण व प्रशिक्षण या उपक्रमाकरिता प्राप्त होणाऱ्या निधीमधून तसेच जिल्हा नियोजन विकास मंडळ आणि आदिवासी उपयोजनेंतर्गत राज्यस्तरीय नियतव्ययामधून उपलब्ध करण्यात येईल. या योजनेंतर्गत करावयाचे वसतिगृह बांधकाम प्राथम्यक्रमाने हाती घेण्यात यावे. वसतिगृह बांधकाम करावयाच्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांची यादी यासोबत **परिशिष्ट-८** व **परिशिष्ट-८ अ** मध्ये देण्यात आलेली आहे. सदर योजना संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या नियंत्रणाखाली सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविली जाईल. बांधकामाच्या प्राथम्याबाबत उच्च व तंत्र शिक्षण विभागामार्फत आदिवासी विकास विभागाची मान्यता घेण्यात यावी.

(नऊ) **<u>औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये आदिवासी विद्यार्थ्यांसाठी पुस्तकपेढी विकसित करणे :-</u>**

आदिवासी उपयोजनेंतर्गत सुरु असलेल्या बहुतांश संस्था तालुका स्तरावर आहेत. या संस्थांमध्ये प्रशिक्षण घेत असलेल्या आदिवासी विद्यार्थ्यांची आर्थिक परिस्थिती बिकट असते. त्यामुळे व्यावसायिक पाठयपुस्तके ते विकत घेऊ शकत नाहीत. आदिवासी विद्यार्थ्यांना प्रशिक्षण कालावधीत अभ्यासामध्ये कोणत्याही प्रकारची अडचण न येता त्यांचे प्रशिक्षण सुलभरित्या पूर्ण

व्हावे, यासाठी आदिवासी विद्यार्थ्यांकरिता औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये पुस्तकपेढी विकसित करण्याच्या योजनेस शासन मंजूरी देत आहे. ही योजना टप्प्याटप्प्याने राबविण्यात येणार आहे. या योजनेंतर्गत अनुसूचित जमातीमधील उमेदवारांसाठी प्रत्येक संस्थेमध्ये त्यांच्या प्रवेश क्षमतेएवढे पुस्तक संच खरेदी करण्यात यावेत. पुस्तक पेढी योजनेतून आदिवासी विद्यार्थ्यांना प्रशिक्षण सत्राच्या सुरुवातील पुस्तकाचा संच उपलब्ध करण्यात यावा व अंतिम परिक्षेनंतर हा संच परत करणे विद्यार्थ्यांवर बंधनकारक राहील. यासाठी उमेदवाराकडून शुल्क आकारण्यात येऊ नये.

प्रथम टप्प्यामध्ये ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील २१०० आदिवासी विद्यार्थ्यांसाठी सन २००४-०५ या वर्षाकरिता रु. १०.५० लाख आणि दूसऱ्या टप्प्यामध्ये आदिवासी क्षेत्राबाहेरील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये शिक्षण घेत असलेल्या अनुसूचित जमातीच्या २५०० उमेदवारांसाठी सन २००५-०६ या वर्षासाठी रु.१२.५० लाख इतकी तरतूद उपलब्ध करण्यात येईल. हा खर्च जिल्हास्तरीय तरतूदीतून भागविला जाईल. सदर योजना व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत राबविली जाईल. संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांनी प्रत्येक व्यवसायाच्या सर्व विषयासाठी योग्य पुस्तकांची निवड करुन आवश्यक पुस्तक संचाची खरेदी शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार करावी.

(दहा) **<u>शिकाऊ उमेदवारी योजनेंतर्गत दुर्गम भागातील आदिवासी शिकाऊ उमेदवारांना निर्वाह भत्ता देणे :-</u>**

औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतून प्रशिक्षण पूर्ण करुन उत्तीर्ण उमेदवार शिकाऊ उमेदवारी अधिनियम १९६१ नुसार कारखान्यांमध्ये शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण पूर्ण करतात. शिकाऊ उमेदवारी परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर कारखान्यामध्ये नोकरीसाठी त्यांचा कुशल कारागिर म्हणून विचार केला जातो. राज्यातील शिकाऊ उमेदवारांसाठी निश्चित केलेल्या जागा प्राभुख्याने मुंबई, ठाणे या शहरी भागामध्ये आहेत. इतर भागात विद्यार्थ्यांना त्यांच्या क्षेत्रात शिकाऊ उमेदवारी उपलब्ध नसल्याने त्यांना मुंबई/ठाणे या शहरी भागामध्ये यावे लागते. परंतु या शहरांमध्ये राहण्याची व्यवस्था नसल्याने तसेच कारखान्याकडून शिकाऊ उमेदवार योजनेंतर्गत दिले जाणारे विद्यावेतन तुटपूंजे असल्याने आदिवासी विद्यार्थी शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण करु शकत नाहीत. परिणामी, कुशल कारागिर म्हणून कारखान्यामध्ये त्यांना नोकरीच्या संधी कमी प्रमाणात उपलब्ध होतात. ही समस्या लक्षात घेऊन शहरामधील विविध कारखान्यात शिकाऊ उमेदवार म्हणून काम करणाऱ्या आदिवासी उमेदवाराला त्या कारखान्यामधून मिळणाऱ्या अल्प विद्यावेतना व्यतिरिक्त उदरनिर्वाहासाठी दरमहा रु.१०००/- एवढा प्रोत्साहन निर्वाह भत्ता देण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

या योजनेचा एकूण २००० विद्यार्थ्यांना लाभ देणे अपेक्षित आहे. त्यासाठी सन २००४-०५ या वर्षी रु.१२० लाख तरतूद उपलब्ध करण्यात येईल. हा खर्च न्युक्लिअस बजेट योजनेतून करण्यात

येईल. सदर योजना आदिवासी विकास विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयाकडून (अपर आयुक्त/प्रकल्प अधिकारी) राबविण्यात येईल. तथापि,लाभार्थ्यांची निवड संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी करावयाची असून उमेदवारांची यादी आदिवासी विकास विभागातील अपर आयुक्त/प्रकल्प अधिकारी यांना सादर केल्यानंतर निर्वाह भत्त्याचे वाटप आदिवासी विकास विभागाकडून करण्यात येईल.

(अकरा) **व्यवसाय प्रशिक्षणाद्वारे आदिवासी महिलांचे सक्षमीकरण करणे :-**

आर्थिक परिस्थितीमुळे आदिवासी मुली इ.१० वी/१२ वी पर्यंत शिक्षण पूर्ण करु शकत नाहीत. त्यामुळे उदरनिर्वाहासाठी त्यांना शेतामध्ये काम करणे अथवा मोलमजुरी करणे इ.वर अवलंबून राहावे लागते. याशिवाय आदिवासी भागात व्यवसाय शिक्षण/ प्रशिक्षणाच्या संधी कमी असून मुलींकरिता वसतिगृहाची सोय नाही. परिणामी, गावाबाहेर व्यवसाय प्रशिक्षणासाठी त्या उत्सुक नसतात व व्यवसाय प्रशिक्षणापासून वंचित राहतात. ही बाब विचारात घेऊन आदिवासी क्षेत्रातील ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये केवळ आदिवासी मुलींसाठी स्वतंत्र व्यवसाय सुरु करुन मुलींचे व्यवसाय प्रशिक्षणाद्वारे सक्षमीकरण करण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे. या योजनेंतर्गत आदिवासी मुलींकरिता खालील ३ प्रकारच्या योजना राबविण्यास मंजूरी देण्यात येत आहे.

(अ) **आदिवासी मुलींकरिता औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये अधिक जागांची निर्मिती करणे:-**

नंदूरबार व गडचिरोली येथे सध्या कार्यरत असलेल्या औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये सोबतच्या **परिशिष्ट-९** मध्ये दर्शविलेले ६ अधिकचे व्यवसाय मुलींसाठी सुरु करण्यात यावेत. याशिवाय त्याठिकाणी मुलींच्या वसतिगृहांचीदेखील व्यवस्था करण्यात यावी. या योजनेसाठी दोन्ही ठिकाणच्या संस्थांसाठी लागणारी २२ कर्मचाऱ्यांची पदे निर्माण करण्यास देखील शासन मंजूरी देत असून पदांचा तपशील **परिशिष्ट-९** मध्ये दर्शविण्यात आलेला आहे. या उपक्रमामुळे महिलांकरिता दरवर्षी १९२ अतिरिक्त जागा निर्माण होणार आहेत. ६ व्यवसायाकरिता अतिरिक्त इमारत बांधकाम, मुलींसाठी वसतिगृह बांधकाम, यंत्रसामुग्री व हत्यारांची खरेदी इ.बाबीकरिता एकूण रु.२७५.०० लाख इतक्या निधीची आवश्यकता आहे. हा निधी विशेष केंद्रीय सहाय्य किंवा आदिवासी उपयोजनेंतर्गत राज्यस्तरीय नियतव्ययातून उपलब्ध करुन दिला जाईल. ही योजना संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण यांचेकडून राबविण्यात येईल.

(ब) **महिला औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये दूसऱ्या पाळीत आदिवासी मुलींकरिता अधिक सुविधा निर्माण करणे** :-

चंद्रपूर/भंडारा/अमरावती/जळगांव व ठाणे या ठिकाणी केवळ महिलांसाठी चालू असलेल्या महिला औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये अस्तित्वात असलेल्या सुविधांचा पूर्ण वापर करुन अन्य ठिकाणच्या आदिवासी भागातील मुलींसाठी दूसऱ्या पाळीमध्ये ९ व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यात यावेत. तसेच त्या ठिकाणी वसतिगृहाची स्वतंत्र सोय करण्यात यावी. वरील ठिकाणच्या औद्योगिक

प्रशिक्षण संस्थेतील पहिल्या पाळीतील मुलींकरिता सध्या जे अभ्यासक्रम सुरु आहेत त्याव्यतिरिक्त नविन १८ व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. याबाबतचा तपशील सोबतच्या **परिशिष्ट-१०** मध्ये देण्यात आलेला आहे. या योजनेसाठी आवश्यक असलेल्या २७ शिल्पनिदेशकाची पदे निर्माण करण्यासदेखील शासन मंजूरी देत आहे. ही पदे कंत्राटी पध्दतीने रु.५५००/- एकत्रित मासिक वेतनावर भरण्यात यावीत. पदांचा तपशील वरील परिशिष्टात देण्यात आलेला आहे. सदर योजनेची अंमलबजावणी करताना सन २००४-०५ यावर्षी ५ संस्थांमध्ये दूसऱ्या पाळीत ९ अधिकच्या व्यवसाय तुकडया सुरु करण्यात याव्यात. तसेच १८ नविन व्यवसाय अभ्यासक्रमासाठी आवश्यक यंत्रसामुग्री व हत्यारे यांच्या खरेदीची प्रक्रिया विहित कार्यपध्दतीनुसार पूर्ण करावी. १८ व्यवसायामध्ये प्रत्यक्ष प्रवेश जानेवारी, २००५ पासून देण्यात यावेत. त्यासाठी सन २००४-०५ या वर्षी रु.१२४.५० लाख, सन २००५-०६ या वर्षासाठी रु. १८६.६६ लाख अशी एकूण रु.३११.१६ लाख इतकी तरतूदी उपलब्ध करण्यात येईल. हा निधी विशेष केंद्रीय सहाय्य किंवा आदिवासी उपयोजनेंतर्गत राज्यस्तरीय नियतव्ययातून उपलब्ध करण्यात येईल. सदर योजनेची अंमलबजावणी व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत केली जाईल.

(क) **आदिवासी क्षेत्रातील औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये मुलींकरिता जादा व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करणे** :-

आदिवासी क्षेत्रातील ५६ औद्योगिक प्रशिक्षण संस्थांपैकी २२ प्रशिक्षण संस्थांमध्ये आदिवासी मुलींकरिता रोजगार क्षमता असलेले प्रत्येकी २ व्यवसाय तसेच २० संस्थांमध्ये प्रत्येक १ व्यवसाय अभ्यासक्रम सुरु करण्यात आले आहे. या २० संस्थांमध्ये आणखी १ अधिकचा व्यवसाय अभ्यासक्रम व उर्वरित १४ संस्थांमध्ये आदिवासी मुलींकरिता रोजगार क्षमता असलेले प्रत्येकी २ व्यवसाय सुरु करण्यास मंजूरी देण्यात येत आहे. याबाबतचा तपशील सोबत जोडलेल्या **परिशिष्ट-११** मध्ये देण्यात आलेला आहे. सदर योजनेमुळे आदिवासी मुलींसाठी दरवर्षी ७६८ अतिरिक्त जागा उपलब्ध होतील. या योजनेसाठी लागणारी आवश्यक ती यंत्रसामुग्री खरेदी करण्यास तसेच जादा अभ्यासक्रमासाठी शिल्पनिदेशक संवर्गातील एकूण ४८ अतिरिक्त पदे निर्माण करण्यास देखील शासन मंजूरी देत आहे. ही पदे कंत्राटी पध्दतीने रु.५५००/- एकत्रित मासिक वेतनावर भरण्यात यावीत.

या योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी सन २००४-०५ या वर्षी १४ संस्थांमध्ये सुरु करावयाच्या २ व्यवसाय अभ्यासक्रमापैकी १ अभ्यासक्रम आणि २० संस्थांपैकी १० संस्थांमध्ये सुरु करावयाच्या एका अभ्यासक्रमासाठी लागणारी आवश्यक यंत्रसामुग्री यांची खरेदी तसेच पद भरती विहित कार्यपध्दतीनुसार करण्यात यावी. त्यासाठी रु.१३५.५० लाख इतकी तरतूद उपलब्ध करुन देण्यात येईल. सन २००५-०६ या वर्षी १४ संस्थांमध्ये उर्वरित प्रत्येकी १ व्यवसाय अभ्यासक्रम व २० संस्थांपैकी १० संस्थांमध्ये सुरु करावयाचा प्रत्येकी १ व्यवसाय अभ्यासक्रम यासाठी लागणारी

यंत्रसामुग्री खरेदी व पदभरती वरीलप्रमाणे करण्यात यावी. या वर्षासाठी रु.१८७.५० लाख तरतूद उपलब्ध करण्यात येईल. अशा रितीने एकूण रु.३२२.५५ लाख एवढा निधी विशेष केंद्रीय सहाय्य व आदिवासी उपयोजनेंतर्गत राज्यस्तरीय नियतव्ययातून दिला जाईल. या योजनेची अंमलबजावणी व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयामार्फत केली जाईल.

(बारा) **अनुसूचित जमातीच्या उमेदवारांसाठी मागेल त्याला व्यवसाय प्रशिक्षण योजना लागू करणे:-**

आदिवासी क्षेत्रातील उमेदवाराकडे व्यवसाय कौशल्याचा अभाव असल्याने त्यांचा विकास होऊ शकत नाही. सेवाक्षेत्रातील मनुष्यबळाची गरज लक्षात घेऊन रोजगार व स्वयंरोजगाराच्या उद्दिष्टपूर्तीकरिता सामाजिक न्याय विभागाने अनुसूचित जाती, विमुक्त जाती, भटक्या जमाती व विशेष मागास प्रवर्गाकरिता सप्टेंबर, २००५ पासून सुरु केलेल्या मागेल त्याला व्यवसाय प्रशिक्षण या योजनेला चांगला प्रतिसाद मिळालेला आहे. म्हणून ही योजना अनुसूचित जमातीच्या उमेदवारांकरिता लागू करण्यास शासन मंजूरी देत आहे. या योजनेखाली सुमारे ६००० उमेदवारांना सन २००४-०५ वर्षामध्ये प्रशिक्षण देण्याचे प्रस्तावित असून औद्योगिक प्रशिक्षण संस्था व शासकीय तांत्रिक विद्यालयामधून रोजगार/ स्वयंरोजगाराभिमूख विविध व्यवसाय अभ्यासक्रमाचे अल्पमुदतीचे प्रशिक्षण देण्याचे प्रस्तावित आहे. या योजनेंतर्गत देण्यात येणारे प्रशिक्षण घेतल्यानंतर आदिवासी विद्यार्थी आयटीआयमधील लोकसेवा केंद्राचे सभासद होवून रोजगार व स्वयंरोजगाराच्या संधी त्यांना प्राप्त होतील. तसेच मुक्त व्यवसाय प्रशिक्षण योजनेंतर्गत विविध स्तरावरील कौशल्य चाचण्या देऊन कारागिर ते टेक्नोक्रॅट इतपर्यंत ते प्रगती साधू शकतील. हे प्रशिक्षण पूर्ण करण्यासाठी आदिवासी उमेदवारांना दरमहा रु.१००/- विद्यावेतन देण्यात येईल. तसेच प्रशिक्षण पूर्ण झाल्यावर प्रत्येक रु.१०००/- किंमतीपर्यंतचे टुल किटस् चे वाटप करण्याची बाबदेखील या योजनेत समाविष्ट करण्यात येत आहे. या प्रशिक्षणाकरिता शिक्षण व वयाची अट राहणार नाही.

योजनेच्या अंमलबजावणीसाठी प्रत्येक उमेदवारासाठी रु.२५००/- याप्रमाणे सन २००४-०५ या वर्षासाठी रु.१५०.०० लाख निधीची आवश्यकता असून हा खर्च आदिवासी उपयोजनेंतर्गत राज्यस्तरीय नियतव्ययातून भागविला जाईल.

या योजनेंतर्गत प्रशिक्षण घेतलेल्या उमेदवारांना पुढे औद्योगिक प्रशिक्षण संस्थेमध्ये लोकसेवा केंद्राचे सभासद करुन घेण्यात यावे व त्यांना रोजगार, स्वयंरोजगाराची संधी उपलब्ध करुन देण्यात यावी. ही योजना व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाने राबवावी. अल्पमुदतीच्या प्रशिक्षणासाठी व्यवसाय अभ्यासक्रमांची यादी व तपशील निश्चित करावा. तसेच उमेदवारांना द्यावयाच्या टुल किटस्चा तपशील निश्चित करुन शासनाने विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार खरेदी करावी.

**(४) योजना केव्हापासून अंमलात येईल :-**

वरील योजनांची अंमलबजावणी सन २००४-०५ या आर्थिक वर्षापासून करण्यात यावी व हा कृती कार्यक्रम ३ वर्षाच्या कालावधीत कालबद्ध पध्दतीने टप्प्याटप्प्याने राबविण्यात यावा. या योजनेसाठी लागणारी **परिशिष्ट - १२** मध्ये दर्शविण्यात आलेली विविध अभ्यासक्रमाशी संबंधित पदे निर्माण करण्यास देखील शासन मंजूरी देत आहे.

**(५) योजनेचे अंमलबजावणी प्राधिकारी :-**

परिच्छेद-१ मध्ये नमूद केलेल्या १२ योजनांपैकी अनु.क्र २ येथील योजना आदिवासी विकास विभागाकडून उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या मार्फत राबविण्यात येईल. तर अनु.क्र १० येथील योजना आदिवासी विकास विभागामार्फत राबविली जाईल. उर्वरित सर्व ८ योजना व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयाकडून आदिवासी विकास विभाग आणि उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या सल्ल्यानुसार राबविल्या जातील. तथापि, योजनांची अंमलबजावणी करताना ज्या ठिकाणी प्रशासकीय व तांत्रिक मान्यतेची गरज भासेल त्या ठिकाणी उच्च व तंत्र शिक्षण विभागामार्फत आदिवासी विकास विभागाची मान्यता घेण्यात यावी.

**(६) योजनेसाठी निधीची उपलब्धता :-**

या योजनांच्या अंमलबजावणीसाठी आदिवासी उपयोजनेतून जिल्हास्तरीय नियतव्ययामधून, केंद्र शासनाकडून प्राप्त होणा-या भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) खालील तरतूदीतून, विशेष केंद्रीय सहाय्यातून तसेच राज्यस्तरीय नियतव्ययामधून उपलब्ध करुन देण्यात यावा व तो खाली नमूद केलेल्या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून संबंधित आर्थिक वर्षात प्राप्त होणाऱ्या मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा. सन २००४-०५ या वर्षी राबविण्यात येणाऱ्या योजनांचा खर्च शासन निर्णय आदिवासी विकास विभाग क्र.बीयुडी-२००४/नविन बाब/प्र.क्र.४३/ का.७, दिनांक २९ जून, २००४ अन्वये उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा. या संदर्भातील तपशीलवार आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

(७) **अंदाजपत्रकीय शिर्ष** :- या योजनेंतर्गत समाविष्ट करण्यात आलेल्या कार्यक्रमांवर होणारा खर्च

"मागणी क्र.टि-४,
लेखाशिर्ष-२२३०-कामगार व सेवायोजना-
पंचवार्षिक योजनांतर्गत योजना
जनजाती क्षेत्र उपयोजना
०३-प्रशिक्षण
००३-कारागिर व पर्यवेक्षक यांचे प्रशिक्षण
०१-औद्योगिक प्रशिक्षण संस्था
(००)(०१) - राज्य योजनांतर्गत योजना (२२३०० ७६४ )
(०१) (०२) विशेष केंद्रीय सहाय्य योजना (२२३०० ७७३)
(०१) (०३) भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अन्वये केंद्रीय सहाय्य (२२३० १०२७)"

